**व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या अधिपत्याखालील अनुसूचित जाती व नवबौध्दांच्या मुलामुलींकरीता विभागीय स्तरावर सुरू करण्यात आलेल्या उच्चस्तर औदयोगिक प्रशिक्षण संस्थामधील योजनांतर्गत अस्थायी पदांना दि.०१/०३/२०२३ ते दि. ३१/०८/२०२३ पर्यंत मुदतवाढ देणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : मुवाढ-२०२३/प्र.क्र.१३८/व्यशि-१ (भाग-१),**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २४ मे, २०२३.

**वाचा :-** (१) कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग, शासन निर्णय क्र. व्यशिअ-२०२०/प्र.क्र.१०२/व्यशि-१ दि. ०७/०४/२०२२.
(२) कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग, शासन निर्णय क्र. मुवाढ-२०२२/प्र.क्र.१९९/व्यशि-१, दि. २४/११/२०२२
(३) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र. क्र. ८/१६/आ.पु.क., दि. ०८/०२/२०२३
(४) सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्र. इबीसी-२००४/प्र.क्र.५/मावक-२ दि. ०९.०१.२००६
(५) संचालक , व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र. व्यशिप्र- २०२२/आस्था-३/मुदतवाढ/प्र.क्र ७३/का.४, दि. १३/०३/२०२३

**प्रस्तावना :-**

व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या अधिपत्याखालील अनुसूचित जाती व नवबौध्दांच्या मुलामुलींकरीता विभागीय स्तरावर सुरू करण्यात आलेल्या उच्चस्तर औद्योगिक प्रशिक्षण संस्थामधील योजनांतर्गत १०७ अस्थायी पदांना संदर्भ क्र. (१) येथील शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात आलेली आहे. संदर्भ क्र. (२) येथील शासन निर्णयान्वये सदर अस्थायी पदांना दिनांक २८/०२/२०२३ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली आहे. वित्त विभागाच्या संदर्भ क्र. (३) येथील शासन निर्णयान्वये दि. ०१/०३/२०२३ ते दि. ३१/०८/२०२३ पर्यंत अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याचे अधिकार प्रशासकीय विभागांना प्रदान केले आहेत. त्या अनुषंगाने संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या संदर्भ क्र. (५) येथील पत्रान्वये सदर पदांना मुदतवाढ देण्याचा प्रस्तावा शासनास सादर केला आहे. त्यास अनुसरुन सदर अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या अधिपत्याखालील अनुसूचित जाती व नवबौध्दांच्या मुलामुलींकरीता विभागीय स्तरावर सुरू करण्यात आलेल्या उच्चस्तर औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमधील योजनांतर्गत १०७ अस्थायी पदांना (सोबत जोडलेल्या

प्रपत्र-अ येथील) दिनांक ०१/०३/२०२३ पासून दिनांक ३१/०८/२०२३ पर्यंत चालू ठेवण्यास या शासन निर्णयान्वये पुढील अटी व शर्तीस अधिन राहून मंजूरी देण्यांत येत आहे:-

**अटी व शर्ती :-**

(१) उपरोक्त पदे ज्या प्रयोजनासाठी निर्माण करण्यांत आली, त्याच प्रयोजनासाठी पुढे चालू ठेवण्यात यावीत. चालू ठेवण्यात आलेल्या अस्थायी पदांवरील कर्मचारी नियमानुसार मिळणारे वेतन भत्ते इत्यादी मिळण्यास पात्र समजण्यात यावेत.

(२) मुदतवाढ दिलेल्या पदांपैकी कोणतेही पद ६ महिन्यांपेक्षा जास्त कालावधीसाठी रिक्त नाही याची खात्री करून घेण्यात यावी.

२. या प्रस्तावावर होणारा खर्च सन २०२२-२०२३ व सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात खालील लेखाशीर्षाखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

> “मागणी क्र. एन-३, मुख्य लेखाशीर्ष २२२५ अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्ग यांचे कल्याण, ०१- अनुसूचित जातीचे कल्याण, २७७-शिक्षण, (०१)(०४) अनुसूचित जाती व नवबौध्द मुला-मुलींकरिता विभागीय स्तरावर औद्योगिक प्रशिक्षण संस्था सुरू करणे (विघयो) (२२२५ ४१०४)”

उपरोक्त लेखाशिर्षाखालील अर्थसंकल्पीय अंदाज, सुधारित अंदाज तसेच अंतिम सुधारित अनुदानाचे प्रस्ताव विहित वेळेत सादर करण्याची दक्षता संचालक (प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, मुंबई यांनी घ्यावी.

३. सदर शासन निर्णय सामाजिक न्याय विभाग यांच्या सहमतीने तसेच वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक: पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि. ०८/०२/२०२३ अन्वये प्रशासकीय विभागाला प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यांत येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०५२४११२४५९९८०३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

PRADEEP SAHEBRAO SHIVTARE

Digitally signed by PRADEEP SAHEBRAO SHIVTARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SKILL DEVELOPMENT AND ENTREPRENEURSHIP DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=be7f8a656a063523ecdbac5e75130d8b7a4674a77a2691e4bf21582d392883e9, pseudonym=323361D01E3FB518718EE3AAAE55DB3EC668FBE8, serialNumber=415BAA8242ED5D99644FE1533246B0A85DC3D52848FB6CE23F47DAF8D647AE5A, cn=PRADEEP SAHEBRAO SHIVTARE
Date: 2023.05.24 11:25:49 +05'30'

**( प्रदीप शिवतरे )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. सर्व संबंधित सह संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय (संचालनालयामार्फत).

३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
४. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६. निवासी लेखाधिकारी, मुंबई.
७. सर्व संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी. (संचालनालयामार्फत).
८. अवर सचिव/कक्ष अधिकारी (व्यशि-१)/(व्यशि-२)/(प्रशा२), कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. अवर सचिव (व्यय-५), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. अवर सचिव (का.१४७१), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
११. उप सचिव (शिक्षण १), सामाजिक न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. निवड नस्ती (व्यशि-१).

**प्रपत्र- अ**

**अनुसूचित जाती व नवबौध्दांच्या मुलामुलींकरिता सुरु करण्यात आलेल्या उच्चस्तर औद्योगिक प्रशिक्षण संस्थांकरिता मंजूर केलेली १०७ योजनांतर्गत अस्थायी पदांचा तपशिल**

| अ.क्र. | पदनाम | ७ व्या वेतन आयोगानुसार वेतनस्तर | | पदांची संख्या |
|---|---|---|---|---|
| | गट-अ | | | |
| १ | प्राचार्य | एस-२० | रु.५६१००-१७७५००/- | ४ |
| | **एकूण गट-अ** | | | **४** |
| | गट-क | | | |
| २ | गटनिदेशक | एस-१५ | रु.४१८००-१३२३००/- | ४ |
| ३ | शिल्प निदेशक | एस-१४ | रु.३८६००-१२२८००/- | ४८ |
| ४ | गणित तथा चित्रकला निदेशक | एस-१४ | रु.३८६००-१२२८००/- | ३ |
| ५ | मुख्य लिपिक/प्रमुख लिपिक | एस-१३ | रु.३५४००-११२४००/- | ४ |
| ६ | वरिष्ठ लिपिक/ लेखापाल | एस-८ | रु.२५५००-८११००/- | १२ |
| ७ | भांडारपाल | एस-८ | रु.२५५००-८११००/- | ४ |
| ८ | कनिष्ठ लिपिक-टंकलेखक | एस-६ | रु.१९९००-६३२००/- | १२ |
| | **एकूण गट-क** | | | **८७** |
| ९ | चतुर्थश्रेणी कर्मचारी | एस-१ | रु.१५०००-४७६००/- | १६ |
| | **एकूण गट- ड** | | | **१६** |
| | **सर्व एकूण** | | | **१०७** |

****